क्षमता बांधणी आणि पूर्व तयारी यासाठी प्राप्त प्रस्तावांचे मुल्यमापन करण्यासाठी राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणांतर्गत समितीची स्थापना.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**(आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२१/प्र.क्र.१५५/आव्यप्र-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दि. ०२ मार्च, २०२३

**वाचा**:- १) आपत्ती व्यवस्थापन विभाग, केंद्रीय गृह मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. ३३-३५/२०२०-NDM-१, दि. १९ नोव्हेंबर, २०२०.

२) शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२१/प्र.क्र.१५५/आव्यप्र-१, दि. २७ सप्टेंबर, २०२१.

**प्रस्तावना**:-

क्षमता बांधणी आणि पूर्व तयारी यासाठी १५ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनूसार राज्य आपत्ती धोके व्यवस्थापन निधी (SDRMF) मधून १०% निधी प्राप्त होणार आहे. त्या संदर्भातील मार्गदर्शक सूचना संदर्भाधीन क्र.१ च्या पत्रान्वये गृह मंत्रालय, भारत सरकार यांनी निर्गमित केल्या आहे.

मार्गदर्शक सूचनांनूसार क्षमता बांधणी आणि पूर्वतयारी यासाठी प्राप्त होणारा निधी राष्ट्रीय राज्यस्तरावरील आपत्ती प्रवणता लक्षात घेवून राबवायच्या प्रकल्पांसाठी, आपत्तीपूर्व सूचना प्रणालीचे सक्षमीकरण करणे, पूर्वतयारी आणि प्रतिसाद यंत्रणांचे सक्षमीकरण करणे, प्रशिक्षण, जनजागृती त्याचप्रमाणे आपत्ती प्रतिसाद दलाचे आणि यंत्रणेचे सक्षमीकरण करण्यासाठी उपलब्ध करण्यात आला आहे.

राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणास प्राप्त होणाऱ्या उपरोक्त निधीच्या विनियोगासाठी राज्यस्तरावर राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणांतर्गत संदर्भाधिन क्र. २ च्या शासन निर्णयान्वये समिती गठीत करण्यात आली होती. सदर समिती पूनर्गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय**:-

क्षमता बांधणी आणि पूर्व तयारी यासाठी १५ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनूसार राज्य आपत्ती धोके व्यवस्थापन निधी (SDRMF) मधून १०% निधी प्राप्त होणाऱ्या १०% निधी अंतर्गत घ्यावयाच्या प्रस्तावांची/ कामांची मुल्यमापन आणि छाननी करण्यासाठी महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणांतर्गत खालीलप्रमाणे समितीची स्थापन करण्यासाठी शासन मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | प्रा. दिपंकर चौधरी सदस्य, राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण (आयआयटी , मुंबई) | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव (वित्त) | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव (जलसंपदा) | सदस्य |
| ४ | अपर मुख्य सचिव (सार्वजनिक बांधकाम) | सदस्य |
| ५ | प्रधान सचिव (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन) | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ६ | श्री. के. एस. होसाळीकर (शास्त्रज्ञ, भारतीय हवामान खाते,मुंबई) | सदस्य |
| ७ | संचालक (आपत्ती व्यवस्थापन प्रभाग) | सदस्य सचिव |

सदर समिती क्षमता बांधणी आणि पूर्व तयारीसाठी प्राप्त होणाऱ्या प्रस्तावांचे मुल्यमापन करुन राज्य कार्यकारी समितीस शिफारस करील.

अन्य मंत्रालयीन विभागाशी संबंधित प्रस्ताव असल्यास संबंधित विभागांच्या अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव यांना समितीच्या बैठकीस विशेष निमंत्रित म्हणून आमंत्रित करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२३०३०२१३०४२९२९१९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने,

(हितेंद्र दुफारे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. उप मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई (सर्व)
४) विभागीय आयुक्त (सर्व)
५) जिल्हाधिकारी (सर्व)
६) निवड नस्ती/ आव्यप्र-१